अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील मान्यवर व्यक्तींची स्मारक बांधणे तसेच ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्टया महत्वाच्या स्थळांचा विकास करणे या योजनेंतर्गत ड्रॅगन पॅलेस टेंम्पल मौजे कामठी, जि.नागपूर येथील विविध विकास कामे करण्याकरिता निधी उपलब्ध करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

## शासन निर्णय क्र.स्वसेस-२०१८/प्र.क्र.२६६/बांधकामे

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ जानेवारी, २०१९

**वाचा :-**

१) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२०१४/ प्र.क्र.६१ / बांधकामे, दि.१६ डिसेंबर, २०१५.

२) शासन शुध्दीपत्रक सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२०१४/प्र.क्र.६१/ बांधकामे, दि.५ मार्च, २०१८.

३) नगर विकास विभागाकडील क्र.बैठक-२०१८/प्र.क्र.२४/नवी-२४, दि.२७ मार्च, २०१८ रोजीचे बैठकीचे पत्र.

४) महानगर आयुक्त, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांचे दि.२७ मार्च, २०१८ रोजीचे पत्र.

५) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र.बीसीएच-२०१३ प्र.क्र.५०(भाग-२)/बांधकामे, दि.३१ मार्च, २०१८.

६) शासन शुध्दीपत्रक क्र.स्वंसेअ-२०१८/प्र.क्र.२६६/बांधकामे, दि.१ डिसेंबर, २०१८.

**प्रस्तावना :**

शासनाच्या दि.३१ मार्च, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये अनुसूचित जाती व नवबौध्द घटकातील मान्यवर व्यक्तींची स्मारक बांधणे तसेच ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्टया महत्वाच्या स्थळांचा विकास करणे या योजनेंतर्गत ड्रॅगन पॅलेस टेंम्पल मौजे कामठी, जि.नागपूर येथील विविध विकास कामे करण्याकरिता निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. तसेच शासनाच्या दि.१ डिसेंबर, २०१८ रोजीच्या शुध्दीपत्रकान्वये ओगावा सोसायटी ड्रॅगन पॅलेस टेंम्पल, मौजे कामठी, जि.नागपूर या संस्थेस प्रकल्पातील १० टक्के हिस्सा भरण्यास व प्रकल्पातील शासनाच्या मालकी हक्कातून सूट देण्यात आली आहे. शासनाच्या दि.३१ मार्च, २०१८ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.४ मध्ये खालीलप्रमाणे नमूद करण्यात आली आहे.

"सदर योजने अंतर्गत आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक, आहंरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांनी मंजूर निधी आहरित करुन तो महानगर आयुक्त, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर यांच्याकडे सुपुर्द करावा. तसेच योजने अंतर्गत मंजूर निधीचे वितरण हे संदर्भ क्र.१ व संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयातील अटीच्या अधीन राहून काटकोरपणे करण्याची जबाबदारी आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांची राहील."

सदर अट वगळण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती यास अनुसरुन शासन आता खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय :-

शासन निर्णय क्र.बीसीएच-२०१३/प्र.क्र.५० (भाग-२)/बांधकामे, दि.३१ मार्च, २०१८ अन्वये मा.मुख्यमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या दि.२७.३.२०१८ रोजीच्या शिखर बैठकीत १) दीक्षाभूमी, नागपूर व २) ड्रॅगन पॅलेस टेंम्पल, मौजे कामठी, जि.नागपूर येथील विकास कार्यक्रम राबविण्यासाठी नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांची नोडल ऐजन्सी म्हणून नियुक्ती करण्यात आली होती.

उपरोक्त नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांची नियुक्ती रद्द करण्यात येत आहे. त्या ऐवजी संबंधीत संस्था म्हणजेच ओगावा सोसायटी ड्रॅगन पॅलेस टेंम्पल, मौजे कामठी, जि.नागपूर व सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण हे कार्यान्वयन यंत्रणा म्हणून काम पाहतील.

तसेच शासन निर्णय क्र.बीसीएच-२०१३/प्र.क्र.५० (भाग-२)/बांधकामे, दि.३१ मार्च, २०१८ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.४ ची बाब वगळण्यात येवून, त्या ऐवजी खालील बाबी अंतर्भूत करण्यात येत आहे.

१) या कामी वितरीत करावयाचा निधी प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, नागपूर, व ओगावा सोसायटी ड्रॅगन पॅलेस टेंम्पल, मौजे कामठी, जि.नागपूर या संस्थेचे अध्यक्ष/सचिव यांच्या संयुक्त खात्यावर ठेवण्यात येईल. तसेच या कामी निधी वितरीत करतांना प्रत्येक वेळी दोघांच्या संयुक्त स्वाक्षरीने त्याबाबतचा धनादेश काढण्यात येईल व वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्यानंतर निधी वितरीत करण्यात येईल. तसेच प्रकल्पाचे बांधकाम सार्वजनिक बांधकाम विभागाने विहीत केलेल्या मानकानुसार, विहीत दर्जाचे व गुणवत्तेचे राहील. याकरिता प्रकल्पाची सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम अधिकाऱ्यांमार्फत तपासणी करुन घेणे बंधनकारक राहील. संबंधीत संस्थेस निधी वितरीत करण्यापुर्वी शासनासोबत करारनामा करावा लागेल व त्यामधील अटी-शर्ती संबंधीत संस्थेवर बंधनकारक राहतील.

२. प्रकल्पाच्या कामाच्या सद्य:स्थितीचा अहवाल आवश्यक त्या तपशीलासह आणि वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र व बांधकामाच्या सद्य:स्थितीचा अहवाल शासनास व आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांना सादर करणे बंधनकारक राहील. सदर कामाचे अंदाजपत्रकास मंजूरी देणे, निविदा प्रक्रिया राबविणे व मुल्यांकन करण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभागाची असेल.

३. प्रस्तुत प्रकल्पातील मंजूर निधीमधून जी मालमत्ता निर्माण करण्यात येईल त्याची देखभाल दुरुस्ती व त्या ठिकाणी सोयी सुविधा पुरविण्याची जबाबदारी ही संबंधीत संस्थेची राहील. त्यासाठी शासनाकडून कोणतेही अतिरिक्त अनुदान/निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही. प्रकल्पाच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याची मंजुरी घेण्यात यावी. इमारत बांधकामाच्या आराखडयास उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर यांची मान्यता घेऊन, प्रकल्पाच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याची मंजुरी घेऊन तो प्रस्ताव आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांच्या मार्फत शासनास सादर करण्याची जाबाबदारी ओगावा

सोसायटी, मौजे कामठी, जि. नागपूर यांची राहील. नियोजित प्रकल्पाचे बांधकाम हाती घेण्यापुर्वी स्थानिक प्राधिकरणाची मान्यता घेणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१३११७१७११८०२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2019.01.31 17:33:09 +05'30'

**(अ.कों.आहिरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
३. मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई/नागपूर
४. अध्यक्ष, ओगावा सोसायटी ड्रॅगन पॅलेस टेंम्पल, मौजे कामठी, जि.नागपूर
५. महालेखापाल महाराष्ट १/२ (लेखापरीक्षा / लेखाअनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
६. आयुक्त, समाजकल्याण, पुणे
७. आयुक्त, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर
८. आयुक्त, महानगरपालिका, नागपूर
९. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, नागपूर
१०.सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण, नागपूर
११.मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर
१२.अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर
१३.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर
१४.जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
१५.मा.मंत्री (सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव,
१६.मा.राज्यमंत्री (सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव,
१७.निवडनस्ती.